**बागायती रोपमळयांचे बळकटीकरण करणे**
**ही राज्य पुरस्कृत योजना सन २००९-१० मध्ये**
**राबविण्यास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. रोवाब-४००९/ प्र.क्र. ६१/१३ अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२,**
**दिनांक : २० फेब्रुवारी, २०१०.**

**वाचा :-**

१) संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.आयु./फलो.-१/ शारोवा/बारोबा /२३७१/२००९, दिनांक ९/९/२००९ चे पत्र.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: पूरक १०.९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३, दि. ३०/६/२००९

३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक -पूरक १००९/प्र.क्र. ७६ /२-अे, दि. ६ जुलै,२००९

४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक- रोवाब ४००९/प्र.क्र.६१/१३-अे, दि.१५ जुलै,२००९

५) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक- रोवाब ४००९/प्र.क्र.६१/१३-अे, दि.११ जानेवारी,२०१०

**प्रस्तावना :-**

राज्यात राबविण्यात येत असलेल्या रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत मुख्यत्वे शासकीय फळरोवाटिकेवरील कलमे / झाडे लाभार्थ्यांना पुरविण्यात येतात. तसेच शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे यांना बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गतसुध्दा राज्यात मोठया प्रमाणावर मागणी आहे. या व्यतिरिक्त शेतक-यांना उत्कृष्ट वाणांच्या लागवड साहित्यांचा पुरवठा करणे, उच्चतंत्रज्ञानाची प्रात्यक्षिक प्रक्षेत्रे विकसित करणे, रोपवाटिकेवरील कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे, इत्यादी अनेक बाबींकरिता शासकीय रोपवाटिकांचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय-**

शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे उत्पादन व इतर माध्यमातून उत्पन्न मिळते. रोपवाटिकाची आर्थिक स्थिती सुधारण्याकरिता उपाययोजना अवलंबण्यात येत असून उत्पादनात वाढ होत आहे. राष्ट्रीय फलोत्पादन अभियान कार्यक्रमासाठी फळपिकाची कलमे/रोपे, भाजीपाला व फुलपिकांची रोपे यासाठी मोठा वाव असल्याने रोपवाटिकासाठी नियमित अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यामुळे सदर योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणे आणि सन २००९-१० मध्ये शासकीय रोपवाटिकेचे बळकटीकरण करणे या राज्यस्तरीय योजनेसाठी रु. ३५०.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी रु.२३३.४२ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन दिला असून उर्वरित रु.११६.५८ लक्ष उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**२.** सदर योजनेकरिता रु. ११६.५८ लक्ष (रु.एकशे सोळा लक्ष अठावन्न हजार फक्त) एवढा निधी खालील लेखाशीर्षातील सन २००९-२०१० करिता मंजूर केलेल्या तरतूदींतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी -३
२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना
११९ - (०३ ) (०३ ) बागायती रोपमळयांची स्थापना व बळकटीकरण (२४०१ १७४२)

**कृ.मा.प.**

**३.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व त्याचे जिल्हानिहाय वितरण करण्यास **आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या योजनेच्या अंमलबजावणीसंबधी मार्गदर्शक सूचना संबंधितांना निर्गमित कराव्यात. वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक ३०/६/२००९ च्या परिपत्रकातील आणि कृषि व पदुम विभागाच्या उपरोक्त दिनांक ६ जुलै,२००९ च्या शासन निर्णयात उल्लेखिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

**४.** सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ ५२८/१४३१, दि. १९-१२-२००९ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १००/२०१०/अर्थ-१३, दि. ३०-१-२०१० तसेच २७/१०/व्यय-१, दिनांक ११/२/२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५ .** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक (**२०१००२२०१३३७२६००१**) असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(हे. द. भांगले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे. (५ प्रती)
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (५ प्रती)
सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. / वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसंकल्प -३/१२ )
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई. / निवडनस्ती